**महाराष्ट्र खनिज विकास निधी अंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक: एमडीएफ -१०१०/प्र.क्र. १०५७ /उद्योग-९
दिनांक: ०४.०८.२०११

**प्रस्तावना:-**

राज्य खनिज धोरण १९९९ मधील धोरणाशी सुसंगत राहून महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजना) निधी अधिनियम २००१ अन्वये महाराष्ट्र खनिज विकास निधीची निर्मिती करण्यात आली आहे.या निधीतून हाती घेण्यात यावयाच्या व शासन परिपत्रक क्र. एमडीएफ -१००२ /प्र.क्र.५५ /उ-९, दि.२६.०८.२००२ मधील मार्गदर्शक तत्वानुसार पात्र ठरणाऱ्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ नागपूर यांनी प्रस्तावित केलेल्या कोल्हापूर जिल्ह्यातील रस्ते बांधणी व विकासाच्या खाली नमूद केलेल्या रु.५७.६५ लक्ष(रु.सत्तावन लक्ष पासष्ठ हजार) अंदाजित खर्चाच्या ०१ कामास या आदेशाद्वारे प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे .

**(रुपये लाखात)**

| अ. क्र. | तालुका | कामाचे विवरण | कार्यान्वयन यंत्रणा | कामांची किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | करवीर | राष्ट्रीय महामार्ग क्र.४ ते विकासवाडी - कुबनूर प्रजिमा २६ ची सुधारणा करणे भाग इजिमा ९३ पासून सांगवडे | सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर | ५७.६५ |
| | | **एकूण १ काम** | | **५७.६५** |

२. या प्रयोजनावरील खर्च मागणी क्र.के-७ मुख्यलेखाशीर्ष "२८५३, अलोह खनिकर्म व धातुविषयक उद्योग-०२ खाणींचे विनियमन व विकास- १०२ खनिज समन्वेषण-(००)(०५)" खनिज विकास (योजनेतर)(२८५३ ०१३ २)या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व या शीर्षाखाली महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ नागपूर यांना सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून भागाविण्यात यावा.

३. महाराष्ट्र खनिज विकास निधीतून मंजूर करण्यात आलेली कामे कार्यान्वयन यंत्रणांनी विना आकारणी तत्वावर करावयाची आहेत.

४.	या कामांना निधी वितरणास मान्यता मिळाल्याशिवाय या प्रयोजनावर खर्च करता येणार नाही. उपरोक्त मंजूर करण्यात आलेल्या प्रस्तावांची कामे करण्यासाठी, निधी वितरीत करण्यापूर्वी महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजन) निधी अधिनियम २००१ व नियम २००१ मधील तरतुदी / शासनाने जी मार्गदर्शक तत्वे ठरविलेली आहेत ती आणि जे आदेश दिले आहेत. त्याचे काटेकोरपणे पालन करण्यात आले आहे याची खातरजमा महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांनी करावी.

५.	सदर प्रशासकीय मान्यता महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजना) निधी अधिनियम २००१ च्या कलम ७(१) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तिनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८०३१७०७३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(ब्र.श.कुलकर्णी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या., नागपूर.
जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर
मा. मुख्यमंत्र्यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (उद्योग-९)